भ्रष्टाचार प्रतिबंधक अधिनियम १९८८ अंतर्गत अभियोग दाखल करण्यास विहीत कालावधीत मंजुरी देणे तसेच गट अ व गट ब मधील राजपत्रित अधिकारी यांच्या बाबतीत प्रशासकीय विभागस्तरावर निलंबन आढावा समितीचे गठन करणे.

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

शासन निर्णय क्रमांकः एसीबी-२०१५/ प्र.क्र.४० /५अे

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

तारीख: १६/३/२०१५

**वाचा -**

१) सामान्य प्रशासन विभाग शा.नि.क्र.निप्रआ-११११/प्र.क्र.८६/११अ,दि.१४/१०/२०११

२) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग शा.नि.क्र.अभियो-१३१२/ प्र.क्र.३०/ पुर्नबांधीत-१,दि.१२/२/२०१३

३) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग शा.प.नि.प्र.आ-१११२/प्र.क्र.८२/११अ, दि. २०/४/२०१३

४) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग शा.नि.अभियो-१३१४/प्र.क्र.८६/११अ, दि. ३१/१/२०१५

**प्रस्तावना -**

शासकीय अधिकारी / कर्मचा-यांना बेहिशोबी मालमत्ता,नैतिक अध:पतन, लाचलुचपत, खुन, खुनाचा प्रयत्न, बलात्कार, या व अशा गंभीर प्रकरणात फौजदारी गुन्हा दाखल झाल्यामुळे निलंबीत करण्यात आले असेल तर निलंबनाच्या दिनांकापासुन एक वर्षानंतर प्रकरणाचा नियतकालीक आढावा घेण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या अ.क्र.१ येथील दिनांक १४/१०/२०११ च्या शासन निर्णयान्वये गट अ व गट ब मधील राजपत्रित अधिका-यांसाठी मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली निलंबन आढावा समिती गठीत करण्यात आली आहे. अशा प्रकरणांवर विहीत कालमर्यादेत कार्यवाही होणे व सक्षम प्राधिका-याची मान्यता घेवून वेळीच निपटारा होणे याकरीता अ.क्र.४ येथील शासन निर्णयात मुख्य सचिव यांच्या ऐवजी प्रशासकीय विभागाचे प्रमुख यांच्या अध्यक्षतेखाली निलंबन आढावा समिती गठीत करण्यात यावी असे नमूद करण्यात आले आहे.शासन निर्णयात समितीची कार्यकक्षा निश्चित करण्यात आली असून परिच्छेद क्रमांक ७ मध्ये समितीची रचना विहीत करण्यात आली आहे. त्यानुसार समितीची रचना गठीत करण्याची बाब विभागाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय –

अ.क्र.४ येथील शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक ७ नुसार कृषि विभागातील समितीचे गठन करण्यात येत असुन समितीची रचना खालीलप्रमाणे असेल.

| | |
|---|---|
| १) विभागाचे अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव | – अध्यक्ष |
| २) अतिरिक्त पोलीस महासंचालक लाचलुचपत प्रतिबंधक विभाग | – सदस्य |
| ३) उप सचिव/सह सचिव(गृह विभाग) | – सदस्य |
| ४) मंत्रालयीन विभागाचे उप सचिव (विभागीय चौकशी ) | – सदस्य सचिव |

**समितीचे कार्ये खालील प्रमाणे असतील :-**

अ) समितीपुढे विचारार्थ सादर करण्यात येणा-या प्रस्तावासंदर्भात सर्वसाधारणपणे खालील प्रमाणे निकष विचारात घेण्यात येतील :-

१) संबंधित अधिकारी यांच्याविरुध्द सक्षम न्यायालयात अभियोग चालविण्यास सक्षम प्राधिकाऱ्याने मंजुरी दिलेली असावी.

२) संबंधित अधिकारी यांच्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु करण्यात येवून दोषारोपपत्र बजावण्यात आलेले असावे.

३) संबंधित अधिकारी यांचा निलंबन कालावधी एक वर्षाहून अधिक असावा.

ब) समिती वरील कार्यपध्दतीचे पालन करुन निलंबीत प्रकरणांचा आढावा घेईल आणि समिती आपल्या शिफारशी असे निलंबन करण्यास अथवा मागे घेण्यास सक्षम प्राधिकारी यांना सादर करील.

क) लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडून प्राप्त झालेल्या व विभागाकडे ९० दिवसांपेक्षा जास्त कालावधीसाठी प्रलंबीत असलेल्या अभियोग मंजूरीच्या प्रकरणांचा निलंबीत अथवा निलंबनाशिवाय पुन:स्थापना /नेमणूक करतांना अकार्यकारी पदावर नियुक्ती आहे किंवा कसे याची तपासणी समिती करेल.

ड) लाचलुचपत/फौजदारी प्रकरणात न्यायालयाने शिक्षा केलेल्या कर्मचा-यांवर कारवाई तात्काळ करण्याबाबत समिती सूचना करील.

१) इ) क्षेत्रीय स्तरावरील गट क व गट ड कर्मचा-यांबाबत अभियोग दाखल करण्याच्या प्रलंबीत प्रकरणचा समिती प्रत्येक महिन्याच्या पहिल्या आठवडयात आढावा घेईल व त्यासंदर्भात अहवाल मुख्य सचिव तसेच अप्पर मुख्य सचिव (गृह विभाग) यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठविल.चीचा मजकूर लिहा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१६१२४६५२८८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas Dattatreya Thakur

Digitally signed by Vilas Dattatreya Thakur
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas Dattatreya Thakur
Date: 2015.03.16 12:56:52 +05'30'

(वि.द.ठाकूर)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१)राज्यपालांचे सचिव
२)मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव
३)मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
४)शासनाचे मुख्य सचिव
५)अप्पर मुख्य सचिव (गृह विभाग)
६)अप्पर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग
७)महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग,वरळी,मुंबई
८) सचिव, महाराष्ट्र विधानसभा / विधानपरिषद, मुंबई
९)विभागातील सर्व उप सचिव /अवर सचिव/ कक्ष अधिकारी
१०)निवडनस्ती